नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : निशिका-२२१९/प्र.क्र.१०७/ना.पु.१५,**

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १८ ऑक्टोबर, २०१९.

वाचा :- १) विभागाचा शा.नि.क्र.संकीर्ण-१००३/प्र.क्र.४८३/नापु-१४, दिनांक २६/०६/२००३,

२) विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि.०६/०३/२०१९,

३) वित्त विभाग शा.नि.क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.११/०९/२०१९.

## शासन निर्णय

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील पदांचा आढावा घेवून संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यात आलेला आहे. या आकृतीबंधानुसार नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा यांच्या आस्थापनेवरील शिधावाटप यंत्रणेसाठी एकूण १८९० पदे मंजूर करण्यात आली आहेत. या पदांमधील अंशकालीन सफाईगार संवर्गातील ५० व अंशकालीन मेहेतर संवर्गातील ४९ अशा एकूण ९९ अस्थायी पदांना संदर्भ क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ३०/०९/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. वित्त विभागाने दिनांक ११/०९/२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/१०/२०१९ ते दि.२९/०२/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार दिलेले आहेत. त्यानुसार नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा मुंबई कार्यालयासाठी अंशकालीन सफाईगार संवर्गातील ५० व अंशकालीन मेहेतर संवर्गातील ४९ अशा एकूण ९९ पदांची आवश्यकता विचारात घेवून, सदर पदे दि.०१/१०/२०१९ ते विभागाचा नवीन आकृतीबंध मंजूर होईपर्यंत किंवा दि.२९/०२/२०२० पर्यंत (यापैकी जे अगोदर होईल तो पर्यंत) पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे. या ९९ अस्थायी पदांची संवर्गनिहाय पदसंख्या पुढील तक्त्यात दर्शविण्यात आलेली आहे.

| अ.क्र. | पदाचे नाव | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सफाई कामगार (अंशकालीन) | ५० |
| २ | मेहेतर (अंशकालीन) | ४९ |
| | **एकूण** | ९९ |

३. उपरोक्त अस्थायी पदांवरील खर्च संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व तो "मागणी क्र.एम-२, २४०८-अन्न साठवण व वखार साठवण, १०१ प्रापण व पुरवठा, (०२) शिधावाटप (०२) (०१) मुंबई शिधावाटप क्षेत्र, दत्तमत (२४०८००६४) ०१, वेतन " या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.११/०९/२०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१८१६०६४१०८०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manojkumar Manikrao Suryawanshi

Digitally signed by Manojkumar Manikrao Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supply and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f01fe9e39ec840cfd8aff420acfb85645316150fbe47d78667d211a870b6cad, serialNumber=171d531e2df977f0515a96704f71cb7e1b7622eae8ceb5547f27f39b9cdd96b0, cn=Manojkumar Manikrao Suryawanshi
Date: 2019.10.18 16:08:02 +05'30'

**( मनोजकुमार सुर्यवंशी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा मुंबई,
२) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
३) महालेखापाल -१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
४) महालेखापाल -१, महाराष्ट्र (लेखा परीक्षा), मुंबई
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) वित्त विभाग (व्यय -४), मंत्रालय, मुंबई - ३२.
८) वित्त विभाग (अर्थसंकल्प १९), मंत्रालय, मुंबई ३२.
९) कोषागार अधिकारी, ठाणे,
१०) निवड नस्ती (कार्यासन ना.पु.१५).